

श्रीमत् प.प. श्रीमत् गुरु वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज.

जन्म श्रावण व॥ ५ शके १७७६ समाधि : आषाढ शु॥ १ शके १८३६

त्वयि भक्तिं मे वर्धय दुर्वृत्तम ईश नाशय अशेषम् ॥
यच्च तवेष्टं तत् कुरु मयि भोः सर्वज्ञ वक्तुमसमर्थः ॥ १ ॥

## श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीसद्गुरु-वासुदेवानन्दसरस्वतीस्वामिमहाराज यांचे—

(१) श्रीदत्तपुराण सटीक

(२) द्विसाहस्री गुरुचरित्र सटीक

(३) समश्लोकिगुरुचरित्र (श्रीगुरुसंहिता) सटीक हे ग्रंथ छापण्यास्तव, श्रीगुरुचरण स्मरून श्रीमंत अखंड सौभाग्यवती महाराणी इंदिराबाई होळकर इंदूर यांनीं रुपये ३००१ तीन हजार एकची सहायता प्रकाशक म्हणून श्रीसद्गुरुसेवा केली ही श्रीचरणीं समर्पित असो.

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

# प्रकाशकाचें निवेदन

श्रीवैष्णवैशगाणेशसौर्यशाक्त्यादिरूपधृक् ॥
दत्तात्रेयोऽस्त्वजोऽनन्तः सदा मे हृदि सद्गुरुः ॥ १ ॥

भगवान् सद्गुरुनाथ श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामिमहाराजांचा सुप्रसिद्ध महान् ग्रंथ संस्कृतद्विसाहस्रीगुरुचरित्र, याचें पुनर्मुद्रण होऊन प्रकाशित करण्याचें भाग्य आज मंडळाला लाभत आहे ही विशेष समाधानाची गोष्ट आहे. 'नान्तो न चादिः' अशा विशाल विश्वांत अनेक कार्ये अहर्निश चालू आहेत. दिवसपाळ्याप्रमाणें कामाच्या रात्रपाळ्याहि आहेत. आणि त्यावेळींहि आपल्या अमूल्य आयुष्याचा नाइलाजानें क्षय करणारीं माणसेंही आहेत. कालानुरोधानें मजुरांच्या हिताविषयीं दक्षता प्रदर्शित करणारी आजची शासनसंस्थाहि अशा अविश्रांत प्रयत्नवादांत सहमतच आहे. अशीच कार्यप्रवृत्ति अखेरच्या श्वासापर्यंत चालू ठेवली पाहिजे, कां या कर्तव्यजंजाळांतून आपणांस व्यवस्थितपणें बाहेर निघतां येईल, तसें असल्यास त्याला उपाय काय इत्यादि विचार कोणीहि करीत असलेला दिसत नाहीं आणि दैनंदिन कार्यापुढें असला विचार करण्यास स्वकर्मसूत्रग्रथित जीवांना सवड तरी कोठें आहे ? अशी सर्व लोकांची दुःस्थिति पाहून ज्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटतें असें अत्यंत कृपाळु साधुपुरुषच लोकहिताचा निरंतर विचार करीत असतात. त्यांचा तो स्वभावच बनून गेलेला असतो. स्वतः कृतार्थ झाल्यानें जे केवळ दुसऱ्या-करितांच उरलेले असतात अशा महापुरुषांचे कायिक, वाचिक, मानसिक सर्वहि प्रयत्न नित्य लोकोद्धारार्थंच चालू असतात. आणि त्यांच्या निर-पेक्ष शुद्ध संकल्पशक्तीनेंच पुण्यवान् जीवहि शांतिसुखाच्या मार्गाला लागून

कृतार्थ होतात. श्रीमहाराजांचे ग्रंथहि याच दृष्टीनें सर्वांच्या कल्याणाकरितांच निर्माण झालेले आहेत. 'हें विश्वचि माझें घर । ऐसी मति जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपणचि जाहला ' या श्रीज्ञानेश्वरमाउलीच्या वर्णनाप्रमाणें ज्यांची मति स्थिर झालेली आहे अशा महापुरुषांचा कोणताहि लहान, मोठा व्यापार स्वार्थाकरितां कसा असूं शकेल ? मति स्थिर झाल्यानंतरच ती आत्मानंदग्राहिणी होते. आणि असा पूर्णानंदाचा आस्वाद जे नित्य घेऊं शकतात त्यांचें लक्ष या सांसारिक क्षुद्र आनंदाकडे जाईल तरी कसें ? छत्रचामरादि ऐश्वर्य भोगणाऱ्या महाराजाला जुन्या बाजारांतील छत्री घेण्याची इच्छा होणें संभवनीय नाहीं व जरूरहि नाहीं. तोच उलट आतपत्रस्त जीवांना नवीन छत्र्या देऊन त्यांचा ताप दूर करील. ईश्वर सृष्टि निर्माण करतो ती स्वतःकरितां नसून जीवांच्याकरितांच करतो. जीवांच्या कर्मांचें तें फल आहे. या दृष्टीनें जीव हेच ईश्वरसृष्टीचा भोग घेणारे आहेत. याप्रमाणें श्रीमहाराजांच्या ग्रंथसंपत्तीचे वारस सश्रद्ध जिज्ञासु जीवच आहेत यांत शंका नाहीं. अशा खऱ्या वारसदारांना ही ग्रंथसंपत्ति मिळावी या उद्देशानें हें मुद्रणकार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रंथप्रकाशकमंडळानें तीन वर्षांपासून सुरू केलें आहे. 'अष्टौ ब्राह्मणान् सम्यग् ग्राहयित्वा सूर्यवर्चस्वी भवति' जो अथर्वशीर्ष आठ ब्राह्मणांकडून तयार करवून घेईल; मग तें लिहून देऊन, प्रत्यक्ष पढवून इत्यादि कोणत्याहि प्रकारानें असो; तो सूर्यासारखा तेजस्वी होतो असें त्याचें फल श्रीगणेशाथर्वशीर्षांत सांगितलें आहे. यावरून सद्ग्रंथांचा प्रचार झाला पाहिजे हें श्रुतीला संमत आहे असें सिद्ध होतें. दक्षिणा कोणती असा उद्धवानें प्रश्न केला असतां 'दक्षिणा ज्ञानसंदेशः' असें श्रीकृष्णप्रभूंनीं उत्तर दिलें आहे. ज्ञानदानासारखी दुसरी दक्षिणा नाहीं. 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत्' सर्व उपनिषदरूपी गाईचें, गीतामृतरूप दूध, गोपालनानें सर्वांना आनंदांत

ठेवणाऱ्या भगवान् श्रीहरीसारख्या कसलेल्या धार काढणाऱ्यानें काढलें, त्या वेळीं अर्जुन हा वत्स मिळाला, त्याला त्याच वेळीं भरपूर तें दूध मिळालें हें खरें; पण तें अर्जुनाला निमित्त करून काढलेलें दूध मुख्यतः सुधीजनांच्या करितांच काढलें गेलें आहे हें निःसंशय. आतां तें दूध वाटतांना मात्र, ' इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन। न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योभ्यसूयति ' अशी दक्षता बाळगण्यास भगवंतांनीं अर्जुनास निक्षून सांगितलें आहे. ' स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परां गतिं। किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ' असे श्लोक पाहिल्याबरोबर तें पुस्तकच अग्नींत टाकणारीं प्राज्ञ माणसें श्रीहरीच्या डोळ्यासमोर त्या वेळीं आलीं असावींत. ही भस्मासुरी वृत्ति निर्माण न होतां ज्ञानदान सफल व्हावें हाच प्रभूचा उद्देश ' अधिकार तैसा करूं उपदेश ' या वाक्यानें संतांनींहि प्रकट केला आहे. खरें ज्ञान केव्हांहि नष्ट होत नसतें, तें नष्ट करण्याचें सामर्थ्य कोणालाहि नाहीं. आधिभौतिक शक्तीचा उच्चांक गांठणाऱ्या हिरण्यकशिपूचा, प्रल्हादाचें ज्ञान त्याला मारून नष्ट करण्याचा प्रयत्नवाद शेवटीं पूर्णपणें अयशस्वी ठरला, त्याचीच आहुति त्यांत पडली. अमोघ विप्रशापामुळें संपूर्ण यादवांचें कुल उच्छिन्न झालें इतकेंच नाहीं तर श्रीहरींनींसुद्धां आपला देह टाकला. पण या दिव्य ज्ञानाचें संरक्षण व्हावें म्हणून त्याच यादव कुळांतील एक यादव उद्धव मात्र श्रीहरींनीं आपल्या मोठ्या संकल्पशक्तीनेंच शेवटीं जिवंत ठेवला. असो. श्रीमहाराजांचे कांहीं ग्रंथ त्यांच्या संमतीनेंच पूर्वी प्रसिद्ध झाले होते. आज त्यांपैकीं कांहींच मिळत नाहींत हें पाहून सर्व ग्रंथांचें व्यवस्थित मुद्रण होऊन ते ग्रंथ जिज्ञासु मंडळींना मिळावेत हाच उद्देश मंडळाचा आहे. या ग्रंथांचें मुद्रण करण्याची आवश्यकता नाहीं, श्रीमहाराजांना हें इष्ट नव्हतें, इत्यादि कांहीं लोकांच्या शंका पुढें आल्यावरून वरीलप्रमाणें सविस्तर निवेदन करावें लागलें. साधनमार्गाचें व्यवस्थित ज्ञान संपादन करून त्याप्रमाणें

प्रत्यक्ष आचरण करणें हाच खरा ज्ञानाचा उपयोग आहे, आणि सद्-ग्रंथांचा प्रचारहि खरा हाच आहे. अर्जुनाला उपदेश करण्यांत देवाला आनंद वाटण्याचें कारण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं लिहिलें आहे तें असें— ' अर्जुना तूं परिससी । परिसूनिया अनुष्ठिसी' अस्तु, याप्रमाणें या ग्रंथांचा प्रचार अनुष्ठानपर्यवसायी होऊन सर्वांना शांति मिळावी हीच त्या सर्वेश्वराजवळ आमची नित्य प्रार्थना आहे.

या ग्रंथाचें नांव संस्कृत श्रीगुरुचरित्र किंवा द्विसाहस्री गुरुचरित्र असें आहे. या ग्रंथावर टीकाही श्रीमहाराजांनींच केलेली आहे. मराठी भाषेंत जें ओवीबद्ध गुरुचरित्र सरस्वती गंगाधरांनीं लिहिलें आहे, ज्याचे पाठ श्रीदत्तभक्तांकडून गाणगापूर, औदुंबर, नरसोबावाडी इत्यादि श्रीदत्त-क्षेत्रांतून व अन्यत्रहि नित्य चालू आहेत, त्या सिद्धग्रंथाचें संस्कृत रूपांतर म्हणजेच हा ग्रंथ होय. याचें महत्त्व ग्रंथाच्या शेवटीं श्रीमहाराजांनीं दाखविलें आहे तें असें—'स एवात्रेयगोत्रोत्थगणेशब्रह्मपुत्रगां । पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रंथात्मा तारकोऽव्ययः '– महाराष्ट्रभाषेंत जो गुरुचरित्रग्रंथ आहे तोच ग्रंथरूपी श्रीदत्तात्रेय, अविनाशी, सर्वांना तारक असा, ग्रंथकर्त्याच्या वाणीला पवित्र करणारा सर्वोत्कर्षानें येथें विराजमान आहे. नित्य पारायण करणाऱ्या भक्तांच्या सर्व पीडा दूर करून त्यांच्या सर्व कामना पूर्ण करणारा हा ग्रंथात्मा श्रीदत्तात्रेय समर्थ आहे असें आश्वासन श्रीमहाराजांनीं या ग्रंथाबद्दल दिलेलें आहे आणि याप्रमाणें याचा श्रद्धेनें नित्य पाठ करणारे सद्भक्त गुरुकृपेचा नित्य अनुभवही घेत आहेत. ग्रंथारंभीं श्रीगुरुस्तुति म्हणून एकशेंबारा श्लोकांचें एक प्रकरण आहे. तें संपल्यावर चरित्रास आरंभ झाला आहे. श्रीगुरुस्तुतीमध्यें मानसपूजा, अपराधक्षमापनस्तोत्र व अष्टोत्तरशतनामावलि हे विषय आले आहेत. ही नामावलि सर्व दकारादि आहे. उपास्यदेवतेच्या प्रसिद्ध नांवांतील आद्याक्षरानें घटित अशीं अनेक नांवें बनवून त्या द्वारानें उपास्याचें गुणवर्णन करणें हें श्रीमहा-

राजांचें बुद्धिकौशल्य खरोखरच अपूर्व आहे. बाह्यरचनेंतही वाचकांचें मन रमून जावें आणि प्रभूचे अचिंत्य गुणही त्यांचे चित्तांत ठसावेत हा दुहेरी उद्देश श्रीमहाराजांनीं यांत साधलेला आहे. एकंदर तेवीस अध्याय या ग्रंथांत असून शेवटीं योगरहस्य व बोधरहस्य हीं दोन प्रकरणें आहेत. प्रसिद्ध मराठी गुरुचरित्रांतील सर्व कथाभाग यांत आलेला आहे. याशिवाय यदू, प्रल्हाद व कार्तवीर्य यांना श्रीदत्तप्रभूंनीं केलेला उपदेशही चतुर्थाध्यायांत वर्णिलेला आहे. श्रीदत्तपुराणाप्रमाणेंच यांतही ज्ञान, कर्म व भक्ति या तीन योगांचें निरूपण केलेलें आहे. प्रथम तेरा अध्यायांत ज्ञानयोग सांगितला. नंतर चौदा ते आठरा या पांच अध्यायांतून कर्मयोग सांगितला आणि शेवटीं पांच अध्यायांत भक्तियोगाचें प्रतिपादन केलें. श्रीमहाराज पूर्वाश्रमांत आपल्या माणगांवांत राहात असतां श्रीदत्तप्रभूंनीं संस्कृत गुरुचरित्र लिहिण्याची आज्ञा केली. त्या वेळीं शके १८०६ मध्यें माणगांवींच हा मूळ ग्रंथ तयार झाला. ग्रंथ तयार झाल्याबरोबर 'संहितेयं द्विसाहस्री' असें देवांनीं सांगितलें. या प्रभूच्या वाक्याचा संबंध या ग्रंथांशीं असावा असें वाटून श्रीमहाराजांनीं (त्या वेळीं वासुदेवशास्त्री किंवा बुवा हें नांव प्रसिद्ध होतें.) ग्रंथाचे श्लोक मोजले पण संख्या पूर्ण होईना. मग सप्तशतीप्रमाणें उवाच मंत्र, कांहीं अर्धश्लोकात्मकमंत्र अशा रीतीनें गणना केल्यावर 'संहितेयं द्विसाहस्री' या देवांच्या सांगण्याचें रहस्य श्रीमहाराजांच्या लक्षांत येऊन कौतुक वाटलें. याप्रमाणें देवांनींच या ग्रंथास द्विसाहस्री हें नांव दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांत कांहीं अशुद्धि व्याकरणदृष्टीनें राहिल्याचें मागाहून लक्षांत आलें तें शुद्ध करण्यास श्रीमहाराज प्रवृत्त झाले असतां 'झालेलें सर्व शुद्ध असून तें मला प्रिय आहे' असें श्रीदत्तप्रभूंनीं श्रीमहाराजांना सांगितलें आणि एका विशिष्ट दृष्टीनें पाहिलें असतां तें शुद्धच ठरतें असेंहि दाखवून दिलें. हृदयस्थ जनार्दन सर्व कर्मांचा कर्ता आहे अशी जाणीव नित्य बाळगूनच

महापुरुषांचीं सर्व कर्में घडत असल्यानें त्यांत अशुद्धि राहाणें शक्यच नाहीं. ईश्वरार्पणबुद्धि ही कर्मशुद्धि करणारी आहे. हा ग्रंथ निर्माण झाल्यावर पंधरा वर्षांनीं म्हणजे शके १८२१ मध्यें यावर संस्कृत टीका प्रभासपट्टण व द्वारका येथें मिळून श्रीमहाराजांनीं पूर्ण केली. ही टीका मूळ ग्रंथ समोर नसतांना झाली अशी आख्यायिका सांगतात. समष्ट्यात्मक भगवत्स्वरूपाशीं संलग्न झालेल्या सत्पुरुषांच्या विशालबुद्धीला अगम्य असें कांहींच नाहीं. श्रीमहाराजांनीं टीकेच्या शेवटीं वरीलप्रमाणें खुलासा केला आहे. ' ज्ञानं त्रयोदशाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः। पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट् ॥ १ ॥ पाश्चात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेभ्युदिताखिलानां। श्रीद्वारकायां चरितस्य तस्य श्रीसद्गुरोर्वेदनुतस्य तस्य ॥ २ ॥ शालिवाहशके क्ष्माश्विवसुभूमिमिते ( १८२१ ) त्वियं। टीका संपूर्णतां याता चातुर्मास्ये ह्यवर्षके ॥ ३ ॥ ' द्विसाहस्री गुरुचरित्राचा संक्षेपानें संस्कृतमध्यें गद्यरूपानें सारांश म्हणजेच चूर्णिका द्वारकेमध्येंच श्रीमहाराजांनीं केली. ती यापूर्वीं छापलेली नव्हती. तीही या खंडांत शेवटीं छापलेली आहे. संस्कृत भाषेचें ज्यांना विशेष ज्ञान नाहीं त्यांनाहि हा चूर्णिकाविभाग समजण्यासारखा आहे. ही वाचून मूळ ग्रंथांतील विषयांचें ज्ञान होईलच पण याशिवाय संस्कृत भाषेचें ज्ञानहि त्यांचें वाढून मूळ ग्रंथरहस्याहि समजून घेण्याची पात्रता त्यांना येईल हाच श्रीमहाराजांचा उद्देश असावा. द्विसाहस्रीच्या टीकेंतून अनेक विषयांचा विचारपूर्वक निर्णय श्रीमहाराजांच्या अधिकारवाणींतून बाहेर पडलेला वाचकांना दिसून येईल. उदाहरणार्थ १ माया कां मानावी ? २ ईश्वर पक्षपाती आहे काय? ३ जगाचें अस्तित्व व नास्तित्व हें अध्यारोपापवादात्मक कसें आहे ? ४ कर्मांचा ज्ञानाला कसा उपयोग होतो ? ५ कर्माचरण कसें केलें असतां चित्त शुद्ध होतें ? ६ ईश्वरावताराचें स्वरूप काय व ते कां होतात ? ७ ब्रह्मचर्याश्रमांतून पुढें गृहस्थाश्रमांतच गेलें पाहिजे किंवा एकदम

संन्यासाश्रमांत जातां येईल ? ८ संन्यासाश्रम घेतल्यावर शिष्यप्रशिष्य-परंपरा कां चालू ठेवावी ? ९ जीवन्मुक्ताची आंतरस्थिति कशी असते ? १० तीर्थयात्रा कां करावी ? ११ सद्गुरुसेवा सर्वांनींच कां करावी ? १२ शरीरांतून जीव जातो कां प्राणवायू जातो, शरीरस्थिति मुख्यतः कोणावर अवलंबून आहे ? १३ अविद्येपासून उत्पन्न झालेलें कर्म ती अविद्या घालविण्यास कसें कारण होतें ? १४ ब्रह्मज्ञानी पुरुषानें कर्म टाकावें काय ? १५ एकाच जन्मांत सर्व कर्मफलाचा भोग भोगून मुक्त होणें शक्य आहे काय ? १६ पतिपत्नीसंबंध, गुरुशिष्यसंबंध, पितापुत्र-संबंध, स्वामिसेवकसंबंध इत्यादिसंबंध कसे निर्माण होतात व ते कसे दूर होतात ? १७ बंधक असणारीं काम्यकर्में वेदांत कां सांगितलीं ? १८ मनुष्य, पितर, देव यांची कालगणना कशी करावी ? १९ चंद्रकलांचें स्वरूप काय ? २० गायत्री मंत्राचा अर्थ काय ? २१ त्या मंत्राचें इतकें महत्त्व कां ? २२ आपत्कालांत कसें वागावें ? २३ मुख्य ज्ञानयोग व त्याचें साधन कर्मयोग यापेक्षां तिसरा भक्तियोग कशाला पाहिजे ? २४ भगवंतांकडूनच वेदाज्ञेचें उल्लंघन झाल्यास तें योग्य कीं अयोग्य ? २५ साकाराच्या भक्तीनें मोक्ष कसा मिळेल ? २६ शूद्र हा श्रौतविद्येचा अधि-कारी आहे कीं नाहीं ? २७ त्याला मुक्ति कशी मिळेल ? २८ रोगादि दुःखांचें खरें कारण कोणतें व त्यांचा परिहार कसा होऊं शकेल ? इत्यादि अनेक प्रश्नांचीं सप्रमाण उत्तरें सविस्तर विवरण करून या टीकेंत श्रीमहाराजांनीं दिलेलीं आहेत. प्रत्यक्ष मुंबई शहर पाहून आलेल्यानें केलेलें त्या शहराचें वर्णन आणि नुसतें भूगोलाचें पुस्तक वाचून एखाद्यानें त्या शहराचें केलेलें वर्णन या दोन वर्णनांमध्यें जितकें अंतर पडतें तितकेंच अंतर केवळ पांडित्यानें लिहिलेल्या ग्रंथांत व श्रीमहाराजांच्या अनुभवी श्रेष्ठ ग्रंथांत असल्याचें विचारी माणसाच्या अनुभवास येईल. अशा श्रीमहा-राजांच्या वाणींतून ग्रंथरूपानें अवतीर्ण झालेल्या श्रीदत्तराजांचें श्रवण,

मनन, निदिध्यासनरूपानें नित्य सेवन करून अधिकारी साधकांनीं निश्चित ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करावा व श्रीमहाराजांच्या ग्रंथनिर्मितीचें सार्थक करावें अशी आग्रहाची विनंति आहे.

श्रीमहाराजांच्या पूर्वाश्रमांतील एक गोष्ट प्रसिद्ध आहे ती अशी— माणगांवीं श्रीदत्तप्रभूंचे आज्ञेनें श्रीमहाराजांचा योगाभ्यास चालू होता. त्या वेळीं प्राणायामाचे अभ्यासांत कांहीं स्खलन झाल्यामुळें उचकी सारखी सुरू झाली. श्रीदत्तगुरूंनीं सांगितलें कीं—'कापशी गांवांत रामकृष्णपंत म्हणून एक मोजणीदार कारकून राहतात. त्यांच्या घराची खूण म्हणजे एक मोठें पिंपळाचें झाड त्यांचे घराजवळ आहे. त्यांचेकडे जावें म्हणजे उचकी लागण्याचें कारण ते सांगतील व त्यावर उपायहि सांगतील.' अशी देवांची आज्ञा झाल्यावर श्रीमहाराज त्या गांवीं आले. व चौकशी करून वरील रामकृष्णपंतांचे घरीं जाऊन त्यांची भेट घेतली, पण त्यांनीं प्रथम आपणांस याबद्दल कांहींच माहिती नाहीं असें दाखविलें. शेवटीं त्या मोजणीदारांना देवाचा दृष्टांत झाल्यामुळें त्यांनीं श्रीमहाराजांना एकांतांत नेऊन सर्व खुलासा पाहिजे तो केला आणि योगासंबंधीं हिंदी भाषेंतील एक ग्रंथ दिला. कबीर व धर्मदास यांचा संवादरूप तो ग्रंथ आहे. कबीरांच्या चौपायांतूनहि योगरहस्य दाखविलें असल्यामुळें त्या ग्रंथाचा श्रीमहाराजांना उपयोग झाला. प्रस्तुत या गोष्टीचें तात्पर्य घेण्यासारखें असें आहे कीं-सिद्धपुरुषांचा लहान मोठा कोणताहि ग्रंथ संग्राह्य आहे. या दृष्टीनें श्रीमहाराजांचें हे दिव्य ग्रंथ सर्वांनीं आपल्या संग्रहास अवश्य ठेवले पाहिजेत. मुद्रणाची सोय झाल्यामुळें लोकांना सर्व ग्रंथ एकदम दिसूं शकतात त्यामुळें प्रत्येकाला आपापल्या रुचिवैचित्र्याप्रमाणें कांहीं तरी अप्रस्तुत शेरा देण्याचा मोह आवरत नाहीं. कोणी म्हणावें, कांहो ! या महागाईच्या दिवसांत हें काम तुम्हीं काढलें हें बरोबर नाहीं. कोणी म्हणावें, यांत पुष्कळ ग्रंथ संस्कृतच

आहेत त्यांचा आम्हाला काय उपयोग ? कोणी म्हणावें, या ग्रंथांची रचना क्लिष्ट आहे. यांत रस कमी असल्यानें यांचा प्रचार होणें कठीण आहे. अशीं अनेक मंडळींचीं टीकात्मक भाषणें कानावर पडतात आणि अशी टीका करणारी मंडळी तर अशा कार्यास साहाय्य करण्याच्या भानगडींत कधींच पडत नसतात. विरोधी शंका पुढें आल्या तरच त्याबद्दल विचार करतां येऊन कार्य करणाऱ्या माणसाला ईशकृपेनें सर्वहि आडमार्गांतून सुखरूप पार पडण्याचें धैर्य येतें म्हणून अशा केवळ विविध शंका प्रकट करणें हेंही एका दृष्टीनें साहाय्यच आहे असें समजण्यास हरकत नाहीं. या शंकांची भीति श्रीगुरुमहाराजांच्या कार्यांत आम्हाला वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. पण कांहीं भाविक ग्राहकांनीं कोणाच्या तरी भिडेमुळें हे ग्रंथ घेण्याचें कबूल केलें असल्यास व त्याबद्दल आपणांवर हा उगीच भार पडला असें कदाचित् त्यांना वाटत असल्यास ती कल्पना त्यांनीं मनांतून काढून टाकून अत्यंत प्रसन्न मनानें यांपैकीं तूर्त समजतील त्या ग्रंथांचें नित्य वाचन ठेवून शांति मिळवावी हें आमचें त्यांना प्रेमपूर्वक सांगणें आहे. त्यांच्यासारख्या भाविक सज्जनांच्या घरांत हे सद्ग्रंथ जे आले ते कोणाच्याही भिडेमुळें त्यांनीं घेतले असें नसून त्यांच्या पूर्वसुकृतामुळेंच हे सिद्धपुरुषांचें वाङ्मयस्वरूप त्यांच्या वास्तूंत अखंड राहाण्याकरितां व सपरिवार त्यांचें कल्याण करण्याकरितांच आलेलें आहे असें त्यांनीं समजावें. आमची तरी तशी दृढभावना आहे. अनेक श्रीमान् मंडळी आपल्या नियतीप्रमाणें द्रव्याचा व्यय अनेक ठिकाणीं करीत असतांही त्यांना सोडून ज्या अर्थी हे ग्रंथ अशा सद्भाविकांचेकडे आले त्या अर्थी त्यांची योग्यता या लौकिक जगांत जरी आज विशेष कोणी मानली नाहीं तरी पारमार्थिक जगांत ईश्वराच्या दरबारांत त्यांचा अधिकार केव्हांही श्रेष्ठच ठरणार यांत शंका नाहीं. आणि ही या भाविक ग्राहकांची खरी योग्यता नित्य डोळ्यापुढें असल्यामुळेंच

त्यांच्याकडील येण्याच्या द्रव्याबद्दल त्यांना विशेष तोशीस आजपर्यंत मंडळानें दिली नाहीं. त्यांचेकडून परिस्थितीप्रमाणें येतील तसे थोडेथोडे पैसे जमा करून, कोणाकोणाचे तर अद्यापि कांहींही पैसे आले नसतांही त्या सर्वांचेकडे प्रकाशित झालेले सर्व खंड मंडळानें पाठविले आहेत. कबूल केल्याप्रमाणें पुढीलही सर्व खंड त्यांचेकडे रवाना होतीलच. श्रीगुरुमहाराजांच्या ग्रंथाविषयीं असलेला शुद्ध आदरभाव हीच त्यांची मोठी पत आहे. प्रपंचांतील अडचणी कोणालाही सुटल्या नाहींत. राष्ट्रीय सरकारला सुद्धां वेळप्रसंगीं जनतेचें कर्ज काढावें लागतें. आपणही अनुकूलता नसली तरी सणवार, मंगलकार्यप्रसंग ऋण काढूनही साजरे करतों. तसेंच हें ग्रंथप्रकाशन म्हणजे आपल्या जीवितांतील महामंगलकार्य आहे असें समजून आम्ही या कार्यास प्रवृत्त झालों आणि अंतःकरणानें श्रीमंत असणाऱ्या सर्व सज्जनांच्याकडे या सत्कार्याकरितां याचना केली. ती त्यांनीं मान्य करून या कार्यास सर्वांनीं अत्यंत शुद्ध प्रेमानें साहाय्य केलें. या त्यांच्या प्रेमऋणामुळेंच हें महत्कार्य पूर्णतेस जाईल असा मंडळास आतां विश्वास वाटूं लागला आहे. त्या सज्जन ग्राहकांना त्यांच्या ऋणाचें रूपांतर म्हणून हे अमूल्य ग्रंथ आम्ही पोंचविण्याचा यावच्छक्य प्रयत्न केला आहे. तो त्यांनीं प्रसन्न चित्तानें गोड मानून घ्यावा एवढीच आमची इच्छा आहे. येत्या श्रावणापर्यंत सर्व मुद्रणकार्य संपविण्याचें ठरल्यानें आर्थिक अडचण भासूं लागली त्यामुळें नाइलाजानें राहिलेलें द्रव्य शक्य तितक्या लवकर पाठवून देण्याबद्दल मंडळाकडून कांहीं ग्राहकांना पत्रें गेलीं आहेत त्याप्रमाणें त्यांचेकडील साहाय्यद्रव्य लवकरच येऊन अडचण दूर होईल अशी आशा आहे. श्रीमहाराजांच्या संस्कृत ग्रंथांतीलही सर्व विषय भाषांतररूपानें, निबंधरूपानें, प्रश्नोत्तररूपानें अशा अनेक प्रकारांनीं अनेक भाषांच्या द्वारानें सर्व जनतेपुढे मांडण्याचा मोठा प्रयत्न यापुढें मंडळास करावयाचा आहे त्यावेळीं आपणांस हे संस्कृत ग्रंथ समजत नाहींत, याचा

काय उपयोग इत्यादि आकांक्षाही सर्वांच्या क्रमशः शांत होतील व सर्वही सच्छील टीकाकारांचे टीकात्मक उद्गारही विराम पावतील अशी खात्री आहे.

मंडळाच्या साहाय्यकांपैकीं पांचशें रुपयांपेक्षां अधिक साहाय्य करणारे सन्मान्य आश्रयदाते असा एक वर्ग आहे. श्री. कृष्णाजी हरी टिळक व श्री. अनंत बामन परांजपे राहणार मुंबई यांनीं प्रत्येकीं ५५१ रुपये देऊन मंडळास उपकृत केलें. श्री. शंकरराव देशमुख वकील राहणार आजेगांव ( निजामस्टेट ) हे मंडळांतील एक सभासद असून श्रीमहाराजांचे निःसीम भक्त आहेत. यांनीं मंडळास १००१ रुपये देऊन आपली गुरुनिष्ठा व्यक्त केली. श्री दत्तोपंत टाकळकर राहणार हैद्राबाद यांनीं आजपर्यंत मंडळास ५६३ रुपये स्वतःचे पाठविले असून अनेक ग्राहक मिळवून देण्याचें महत्त्वाचें प्रचारकार्यही यांचेकडून व्यवस्थित चालू आहे. सौ. सरस्वतीबाई कवीश्वर यांनीं स्त्रीवर्गांत या कार्याचा प्रचार करून तृतीयपुष्प, श्रीदत्तमाहात्म्य व चरित्रखंड असे तीन मराठी खंड बारा रुपये देऊन घेणारे स्त्रीग्राहक मंडळास मिळवून देण्याचें कार्य गुरुसेवाबुद्धीनें चालविलें आहे. यांचेकडून आजपर्यंत पांचसहाशेंपेक्षांही अधिक रक्कम मंडळाकडे जमा झाली आहे. अशी निष्ठेनें या कार्यास साहाय्य करणारी मंडळी श्रीगुरुमहाराजांचे कृपेनें मंडळास मिळाल्यानें हें कार्य लवकर तडीस जाऊं शकलें. या सर्व साहाय्यकांचें पूर्ण कल्याण करण्यास श्रीगुरुमहाराजच समर्थ आहेत. 'न हि कल्याणकृत् कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति,' 'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्' ही भगवंतांची सिद्धांतवाणी प्रसिद्धच आहे.

या महत्त्वाच्या ग्रंथावर कोणीतरी अधिकारी शास्त्रज्ञ पुरुषांची प्रस्तावना मिळावी अशी इच्छा होती. ती श्रीगुरुमहाराजांनीं पूर्ण केली. मंडळाचे विनंतीस मान देऊन काशी क्षेत्रांतील सुविख्यात पंडितवर्य

न्यायाचार्य श्रीहरिरामशास्त्रीजी शुक्ल प्राध्यापक सांगवेदविद्यालय यांनीं ग्रंथार्थतात्पर्यप्रकाशक व महत्त्वदर्शक अशी गंभीर प्रस्तावना या ग्रंथावर लिहून दिली याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत. त्यांचे गुरुजी पंडितराज राजेश्वरशास्त्रीजी यांनीं ' शिक्षात्रय ' या प्रथम खंडावर प्रस्तावना लिहून देऊन मंडळाला ऋणी केलें आणि ' प्रवर्तितो दीप इव प्रदीपात् ' अशा अधिकाराच्या त्यांच्या पट्टशिष्यांनीं पं. हरिरामशास्त्रीजींनीं 'गुरुरनुगन्तव्यः ' या आदेशाप्रमाणें या ग्रंथावर प्रस्तावना लिहून मंडळास उपकृत केलें. अशा विद्वज्जनांचें हें प्रेमऋण मंडळावर अधिकाधिक व्हावें व शास्त्ररहस्यप्रकाशन मंडळाचे द्वारा होत राहून त्या योगानें अशा विद्वज्जनांच्या ऋणाचें अंशतः तरी परिमार्जन व्हावें अशी श्रीकाशीविश्वेश्वरांचे चरणसन्निध अखंड प्रार्थना आहे.

निजामस्टेटमध्यें हिंगोली तालुक्यांतील नरसी या गांवीं श्रीमहाराजांचा एक चातुर्मास्य झाला होता. या गांवावर श्रीमहाराजांचें फार प्रेम होतें. तेथील मंडळींचें उत्कट प्रेम हेंच त्याचें कारण मानावें लागेल. या गांवांतील प्रसिद्ध शास्त्रज्ञ पं. धुंडिराजशास्त्री माहूरकर यांचा या ग्रंथावर विशेष व्यासंग असल्याचें समजल्यावरून त्यांनाहि या ग्रंथावर चार शब्द लिहून देण्याबद्दल मंडळानें विनंति केली होती. ती त्यांनीं मान्य करून अत्यंत आत्मीयतापूर्वक 'द्विसाहस्रीमाहात्म्यम् ' म्हणून जो लेख पाठविला त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. तो लेख ग्रंथारंभीं प्रस्तावनेनंतर छापला आहे. द्विसाहस्रीची सप्ताहवाचनपद्धति व मंत्रविभागकारिकाही त्यांनीं दिलेल्या आहेत. यामुळें सश्रद्ध साधक जनतेला विशेष उपयोग होणार आहे. त्यांचा दीर्घ व्यासंग या रूपानें त्यांनीं जनतेपुढें मांडून सर्वांसच उपकृत केलें आहे याचें फल त्यांना श्रीगुरुमहाराजच देण्यास पूर्ण समर्थ आहेत. समर्थभारत छापखान्याचे मालक श्री. सर-

देसाई यांनींहि वेळेवर व्यवस्थित ग्रंथ छापून दिल्याबद्दल तेही धन्यवादास पात्र आहेत.

याप्रमाणें पुढीलहि अवशिष्ट मुद्रणकार्य निर्दिष्टकालांत पूर्ण होण्याकरितां कृत, कारित व अनुमोदित यांपैकीं कोणत्याहि प्रकारानें कां होईना, सर्वांनीं साहाय्य करावें हीच शेवटीं त्या विश्वतोमुख परमात्म्याजवळ सविनय प्रार्थना आहे.

वैशाख शु॥ ३ (अक्षय्यतृतीया)
बुधवार शके १८७६
दि. ५-५-१९५४

श्रीगुरुसेवार्थी
वामन दत्तात्रेय गुळवणी
अध्यक्ष—श्रीवासुदेवानंदसरस्वती-ग्रंथप्रकाशनमंडळ, नारायण पेठ २०, पुणें २

---

श्रीगुरुः शरणम्

# प्रस्तावना

गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ।
गुरुः साक्षात्परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १ ॥

श्रीमद्भिः साक्षाद्भगवतो गुरोर्दत्तस्यावतारभूतैः प. प. श्री. वासुदेवानन्दसरस्वतीस्वामिचरणैः संस्कृतभाषायां निबद्धस्य गुरुचरित्राभिधस्य ग्रन्थरत्नस्य सुपरिष्कृतं संस्करणमिदं पाठकानां पुरत उपस्थाप्यते। महाराष्ट्रभाषामयोऽयं ग्रन्थः यद्यप्यासीदेवानुवर्तमानः तथापि तद्भाषानभिज्ञानां गुरुभक्तानां समेषामप्युपकारायैव परमकारुणिकैः स्वामिचरणैरेतस्य निर्माणं कृतमिति विदितमेव स्यात्तज्जीवनवृत्तान्तविदाम् । संस्कृतभाषायाश्चात्रत्यायाः सामान्यव्युत्पत्तिमतां बोधगम्याया अभावेन तथाविधानप्युपकर्तुं तट्टीकापि तैरेव विरचिताऽनेन सहैव प्रकाशिता वर्तते ।

ग्रन्थेऽस्मिन् प्राधान्येन ज्ञानयोग-कर्मयोग-भक्तियोगाः, योगरहस्यं बोधरहस्यं चेति रहस्यद्वयमन्ते निरूपितमस्ति। आदावपि गुरुस्तुत्याद्युपोद्घातांतो भागः संक्षेपेण प्रतिपादितः ।

॥ गुरुतत्त्वविमर्शः ॥

एतस्मिन् ग्रन्थे प्राधान्येन परमपुरुषार्थभूतं गुरुतत्त्वमेव प्राप्तव्यत्वेनोपदिष्टमस्ति । तच्च गुरुतत्त्वं अखण्डानन्दैकरसं ज्ञानस्वरूपमेव। सर्वेषामेव आस्तिकनास्तिकमतानुयायिनां पूर्वोक्तगुरुतत्त्वाप्तिविषये नास्ति कोऽपि मतभेदः । इदं हि गुरुतत्त्वं प्राणाद्यपेक्षयापि प्रियतरमस्तीति स्पष्टमेवावगन्तुं शक्यते । तथाहि—सर्वोऽपि जनः शरीरापेक्षया प्राणान् प्रियत्वेन विजानाति । दृश्यते खलु शरीरे व्याधावुत्पन्ने चिकित्सको यदि वदति शरीरस्येन्द्रियस्य वा भागो विकर्तितः स्यात्तर्ह्येव प्राणरक्षणं सम्भवति अन्यथा तु

प्राणा गमिष्यन्तीति, तदा जनः प्राणरक्षणाय शरीरस्य भागं परित्यजति। प्राणापेक्षया किं प्रियमित्यालोच्यमाने मानस्य तदपेक्षयाधिकप्रियत्वं सिध्यति अत एव मानपरिरक्षणाय जनो हसन्नेव प्राणान् परित्यजति। ततोऽपि प्रियत्वं ज्ञानस्येत्यनुभवामः। ज्ञानार्थमेव खलु स्वकीयं मानमेकत्रावस्थाप्य गुरोः सविधे नम्रीभूय तिष्ठति जनः। तस्मादनेनोदाहरणेनैव सिद्धमेतत्, यत्-ज्ञानस्य प्राणापेक्षयापि अधिकप्रियत्वं तत एव चानन्दरूपत्वमपि। तदेव खलु गुरुतत्त्वं दत्तात्रेयपदेनात्रोपास्यत्वेन प्रतिपाद्यते। पूर्वोक्तः "गुरुर्ब्रह्मा" इत्यादिश्लोक उक्तमेवार्थं प्रकाशयति।

तदिदं ज्ञानरूपं गुरुतत्त्वं, देशकालापरिच्छिन्नत्वात्सर्वदा प्राप्तमेव यद्यपि, तथापि प्राप्तमप्यविद्यावशादप्राप्तमिव, अविद्यातिरोधानेन च प्राप्तमिव भवतीति, उपनिषदां उपक्रमोपसंहारादितात्पर्यनिर्णायकलिङ्गैः सिद्धः सिद्धान्तः सोऽयं सिद्धान्तः—" नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः।

यत्तत्त्वं मीलति ज्ञानां तं चिदानन्दसद्गुरुम् ॥

इति श्लोके तट्टीकायां च स्पष्टमेव प्रतिपादितो दृश्यते।

तच्चाविद्यातिरोधानं विद्ययैव भवितुमर्हति। रज्जुसर्पादिस्थले सर्पोपादानभूताया रज्ज्वविद्यायाः रज्जुज्ञानेनैव तिरोधानात्। यद्यपीदं अविद्यातत्कार्यातिरोधानं तन्नाशात्मकं तत्त्वज्ञानेनोत्पद्यते इति न वक्तुं शक्यं तत्त्वज्ञानानन्तरं तस्योत्पत्तावङ्गीक्रियमाणायामद्वैतव्याघातापत्तेः तथापि तत्त्वज्ञानक्षणस्य अविद्यातत्कार्यपूर्वत्वाभावनियम एवाङ्गीकर्तव्यः। दृष्टश्चायं नियमः रज्जुतत्त्वज्ञानस्थले इत्ययमंशो गौडब्रह्मानन्द्यादौ विवेचितः, विस्तरतस्तत एवावगन्तव्यो विशेषजिज्ञासुभिः।

अविद्यास्वरूपमपि—अनादिभावरूपं यद्विज्ञानेन विलीयते।

तदज्ञानमिति प्राज्ञा लक्षणं सम्प्रचक्षते "

इति चित्सुखाचार्योक्तरीत्या अनादिभावत्वे सति ज्ञाननिवर्त्यत्वरूपं द्रष्टव्यम्। ज्ञानप्रागभावादन्यः कश्चन भावरूपोऽज्ञानपदार्थः कुतः स्वीकर-

णयिः ? इति प्रश्नस्तु अद्वैतसिद्धिचित्सुखीविवरणप्रमेयसङ्ग्रहादिषु सयुक्तिकमुपपादित एव ।

अस्य चाज्ञानस्य शक्तिद्वयमस्ति असत्त्वापादकशक्तिः अभानापादकशक्तिश्च । परोक्षज्ञानस्थले असत्वापादकमज्ञानं निवर्तते नाभानापादकं अनुमितौ जातायां पर्वते वह्निरस्तीत्येव प्रतीतिर्भवति न तु पर्वते वह्निर्भातीति । प्रत्यक्षस्थले तु उभयविधा शक्तिरपि तस्य नश्यति ।

कीदृशं तत्त्वज्ञानं ? यज्जगता सहैव तदुपादानभूतां अविद्यां निवारयितुं क्षममिति प्रश्नोऽपि " स्वाभेदेन विवर्ताधिष्ठानभूतपरब्रह्मवेत्तृणां " इति पूर्वोक्तश्लोकटीकादर्शनेन समाहितो भवति । तथाच " अहं ब्रह्मास्मि तत्त्वमसि " इत्यादिमहावाक्यार्थबोध एवाखण्डार्थविषयकः अन्तःकरणवृत्तिरूपस्तस्याज्ञानस्य निवर्तक इति सिध्यति ।

॥ अखण्डार्थबोधस्वरूपविमर्शः ॥

"तत्त्वमसि" "अहं ब्रह्मास्मि" "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" इत्यादिवाक्येभ्यो जायमानो बोधः अखण्डार्थविषयक इत्यद्वैतवेदान्तसिद्धान्तः । वाक्यस्याखण्डार्थकत्वं—अपर्यायशब्दानां संसर्गागोचरप्रमितिजनकत्वम् । तदुक्तम्—

" संसर्गासङ्गिसम्यग्धीहेतुता या गिरामियम् ।
उक्ताखण्डार्थता यद्वा तत्प्रातिपदिकार्थता ॥ " इति ।

यद्यपि 'गामानय भूतले घट' इत्यादिवाक्यानां तत्तत्पदोपस्थाप्यार्थसंसर्गविषयकप्रतीतिजनकत्वाद्वाक्यमात्रस्यैव संसर्गविषयकप्रतीतिजनकत्वनियमेन संसर्गाविषयकप्रतीतिजनकत्वं न क्वापि वाक्ये सम्भवतीत्याक्षिप्यते परैः तथापि वाक्यमात्रस्य तथाविधबोधजनकत्वं न वक्तुं शक्यं, " प्रकृष्टप्रकाशश्चन्द्र " इत्यादिलक्षणवाक्येषु पदद्वयार्थसंसर्गाविषयकबोधजनकत्वस्यैवावश्यं स्वीकरणीयत्वात् । तथाहि-अनेन हि वाक्येन चन्द्रस्वरूपमात्रमेव प्रतिपाद्यते, चन्द्रस्वरूपस्य प्रकृष्टप्रकाशेतरव्यावृत्तिस्तु अव-

गम्यमानापि न शब्दतः साक्षादवगम्यते, अपि तु अर्थत एव सा सिद्ध्यति। दृश्यते हि "गामानय" इत्यादि-वाक्येष्वपि शब्दतो गवानयनकर्तव्यतावगतावपि अश्वाद्यानयनव्यावृत्तेरवगमस्यार्थत्वम्। एवमेव "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" इत्यादावपि ब्रह्मस्वरूप-मात्रप्रतिपत्तिर्वाक्यात्, आर्थिकी त्वसत्यादिव्यावृत्तिप्रतीतिरिति।

तत्राखण्डार्थबोधस्य कया रीत्या उत्पत्तिरिति विचारयामः। आदौ "तत्त्वमसी" ति वाक्यश्रवणं, ततस्तत्त्वंपदयोः समभिव्याहारज्ञानं, ततो विशेष्यविशेषणभावेन तत्त्वंपदार्थान्वयधीः, ततो विरोधज्ञानं अयोग्यताज्ञानापरपर्यायं, ततश्चोक्तज्ञाने तात्पर्याभावज्ञानं, ततो लक्ष्यार्थघटितवाक्यार्थज्ञाने तात्पर्यावधारणम्, ततश्च लक्षणाज्ञानाधीनं शुद्धस्य निर्विकल्पकं स्मरणं, ततश्चाखण्डार्थविषयको महावाक्यार्थबोधः।

एतच्च—"सामानाधिकरण्यमत्र भवति प्राथम्यभागन्वयः
पश्चादेव विशेषणेतरतया पश्चाद्विरोधोद्भवः।
उत्पन्ने च विरोध एकरसके वस्तुन्यखण्डार्थधीः
सर्वैरेव ततः पदैरयमिह ज्ञेयः क्रमः सूरिभिः॥"

इति संक्षेपशारीरके स्पष्टम्।

एवं क्रमेण तत्त्वमस्यादिवाक्यजन्यं ज्ञानं यदा अपरोक्षतापन्नं भवति, तदैव सवासनमिथ्याज्ञानतत्कार्यनिवृत्तौ सत्यां मुक्तिरिति वेदान्तसिद्धान्तोऽत्र टीकायां सप्रपञ्चं प्रपञ्चितो वर्तते।

तच्च वृत्तिरूपं ज्ञानमपरोक्षरूपं यावत्पर्यन्तं नोत्पन्नं भवति, तावत्पर्यन्तं नास्य प्रपञ्चस्य निवृत्तिः सम्भाव्यते, अपरोक्षावभासस्यापरोक्षप्रमयैव निरस्यत्वसम्भवात्, इत्यपरोक्षप्रमार्थमुपासनाया आवश्यकता प्रतिपादिता। तदभावे हि मिष्टाशी रुग्णो बालो निम्बमिव विषयाकृष्टचित्ताः संसारिणः मातापितृशतेभ्योऽपि गरीयसीभिः श्रुतिभिः परमकारुणिकैर्भाष्यकृदादिभिर्बहु बोधिता अपि तं बोधं नाद्रियन्ते। अतः खण्डलड्डुकवत्सगुणब्रह्म-

प्रसादरूपफलेन तानादरपूर्वकं परे तत्त्वे प्रवर्तयितुमुक्तस्य ग्रन्थस्यारम्भः इति टीकाकाराः कथयन्ति ।

तत्रापि च ज्ञानस्य साक्षान्मोक्षसाधनतायाः "तमेव विदित्वा अतिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय" "तरति शोकमात्मवित्" इत्यादिश्रुतिशतेन प्रतिपादनात् ज्ञानकाण्डस्य प्रथमं निर्देशः कृतः

ज्ञानकाण्डेऽस्मिन्नाहत्य त्रयोदशाध्यायाः सन्ति। तत्र प्रथमाध्याये गुरुतत्त्वरूपस्य भगवतो ज्ञानस्य प्राधान्यख्यापनं, भगवतो गुरोर्गुणानुवादान् वक्तुं सद्गुरुः दत्तात्रेय-श्रीपाद-नृहरिरूपेणावतारत्रयं भक्तानुग्रहार्थमग्रहीत् ।

"प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः"

"उपासकानां कार्यार्थं ब्रह्मणो रूपकल्पना" इत्याद्युक्तत्वात् ।

कलौ युगे कृष्णामरजातीरविहारिणो भगवदवतारत्वमघटितघटनापटीयस्त्वेन साधितम् । तथाविधं गुरुं नामधारको द्विजः कृष्णामरजासन्निधौ गत्वा तुष्टाव । ततः सन्तुष्टो भगवान् स्वप्ने स्वरूपं तमदर्शयत्, इति वर्णनमस्ति ।

द्वितीये चाध्याये ब्रह्मणा कलये प्रोक्तां गुरुशिष्यकथां सिद्धो नामधारकमकथयद्भक्तिदार्ढ्याय ।

तृतीये चानसूयासत्त्वहरणाय स्त्रीप्रेरिता ब्रह्मविष्ण्वादयोऽर्भका जाताः इति कथा, अम्बरीषकथा च प्रतिपादिता । सोऽयमुपदेशः पतिव्रतामाहात्म्यं विशेषेण प्रकाशयति ।

चतुर्थे यदुना पृष्टश्चतुर्विंशतिगुरुभ्यः प्राप्तं ज्ञानं भगवान् दत्त उपदिदेश पञ्चमे ब्राह्मण्या भक्त्या श्रीपादसंज्ञको दत्तस्तत्पुत्र अभूदिति कथा वर्णिता। एवमनन्तरमात्रयोदशाध्यायं ज्ञानयोगस्यैव विस्तारः कृतः ।

पूर्वोक्तेन प्रकारेण ज्ञानकाण्डे ज्ञानस्यैव मोक्षसाधनत्वं वेदान्ताभिमतं युक्तिसिद्धं चेति प्रतिपाद्य कर्मप्रतिपादकानां वेदवाक्यानां वेदत्वाविशेषादेव मुक्तिसाधनप्रतिपादकत्वं स्याद्दिति कथं ज्ञानस्यैव मोक्षसाधनत्वमित्याशङ्कां निराकर्तुं पञ्चभिरध्यायैः कर्मकाण्डस्य प्रतिपादनमत्र कृतम् ।

अस्याभिप्रायस्त्वथम्, मुक्तिं प्रति साधनत्वं ज्ञानस्यैव यद्यपि शास्त्रसम्मतं, तथापि ज्ञानकाण्डस्य कर्मकाण्डेन सह साध्यसाधनभावसम्बन्धोऽस्त्येव, ज्ञानोत्पत्तौ कर्मणामुपयोगोऽङ्गीकृत एव। तेषामुपयोगस्तु संस्कारत्वेन विविदिषोत्पादनेन वा अत एव पारमर्षं सूत्रम्—"सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत्" इति। उक्तं हि मनुना—

"स्वाध्यायेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः।
महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः॥" इति।

अत्र ब्राह्मी—ब्रह्मसम्बन्धिनी तज्ज्ञानद्वारा, इति व्याख्यातं टीकाकृद्भिः।

अपि च विविदिषायामात्मज्ञानेच्छारूपायामपि कर्मणामस्त्युपयोगः। सा खलु मुमुक्षायां सम्पद्यमानायां भवितुमर्हति, फलेच्छाया उपायेच्छां प्रति कारणत्वात्। मुमुक्षा तावत् "भीष्मः खल्वयमपवर्गः अस्मिन् सति बहुभद्रकं लुप्यते" इति न्यायभाष्यकृदुक्तरीत्या ये जनाः मोक्षमनिष्टतया भ्रान्त्याऽवगच्छन्ति, ये च नास्त्येव मोक्षाख्यः कश्चन पदार्थ इति चावगच्छन्ति तादृशानां जनानां कथमपि न सम्भाव्यते इति, नित्यनैमित्तिककर्मणामनुष्ठानेन ईश्वरप्रसादात्मकस्य धर्मस्योत्पत्तौ सत्यामेव मुमुक्षायास्तत्साध्याया विविदिषायाश्चोत्पत्तिः सम्भवति। अत एवाह श्रुतिः—"तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेन" इति।

"महापापवतां नृणां ज्ञानयज्ञो न रोचते।
प्रस्तुतज्ञानयज्ञस्तु प्रद्वेष्यो भासते स्वतः"

इत्यादिना विविदिषाया अभावो लोके स्वतःसिद्ध इति प्रतिपादितमेव। उक्तमेव च श्रीहर्षचरणैः—

"ईश्वरानुग्रहादेव पुंसामद्वैतवासना।
महाभयकृतत्राणा द्वित्राणामेव जायते॥"

इत्यादि। इदमपि प्रसङ्गतो वक्तव्यमापतति, वर्तमाने काले यथावत्कर्मानुष्ठानस्य प्रतिदिनमेधमानो लोप एव लोकान् मुमुक्षाविमुक्तान् प्रशस्तपादभाष्योक्तेन—

" यत्तु विदुषामसत्सु विषयानुस्मरणेच्छासङ्कल्पेष्वाभिर्भवति, तद्विद्याशमसन्तोषधर्मविशेषनिमित्तम् " इत्यादिना प्रतिपादिते सुखे सर्वथा अपरिचितान्कुर्वन् सर्वत्रैवाशान्तेः साम्राज्यमवस्थापयति ।

" आत्मा वाऽरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः " इति श्रुत्या आत्मसाक्षात्कारमुद्दिश्य मननादिसहितं श्रवणं विधीयते । तत्र श्रवणं तावन्न ज्ञानरूपं ज्ञानस्याविधेयत्वात्, अपि तु तर्कात्मिका मानसी क्रियैव, श्रवणाभिधस्य तर्कस्य स्वरूपं तु "तत्त्वमस्यादिवाक्यं यदि ब्रह्मात्मैक्यपरं न स्यात्तदोपक्रमोपसंहारादिभिरपि अद्वैतब्रह्मबोधकं न स्यादित्येवंरूपम् । अस्य प्राधान्यं तु प्रमाणीभूतं यद्वेदवाक्यं तत्तात्पर्यविषयकत्वादेव । मननं तावत् वाक्याधीनस्य ज्ञानस्य परोक्षनिश्चयत्वाभावसम्पादकतर्करूपम् । स च तर्कः-

" तत्त्वमस्यादिवाक्यजन्यं ज्ञानं यदि परोक्षं स्यात्तर्हि स्वप्रकाशात्मविषयकं न स्यादित्येवंरूपः, इति विवरणकारमतं, संक्षेपशारीरकमते तु ब्रह्मात्मैक्यसिद्धयनुकूलस्तर्को मननम् । निदिध्यासनं श्रवणमननयोरैकाग्र्यं पौनःपुन्यापरपर्यायम् । मननं ब्रह्मात्मैक्यासम्भावनानिरासकं, निदिध्यासनं तु विपरीतभावनानिरासकमिति ।

तदिदमात्मदर्शनं न केवलं कर्मानुष्ठानेन विविदिषायामुत्पद्यमानायामपि तदुत्पत्तिमात्रेण भवति, अपि तु तदुपायानुष्ठानमपि तत्रावश्यकमेव ।

कश्च तत्रोपाय इति प्रश्ने—भगवतो गुरोर्भक्तिरेव तत्र कारणमिति सिद्धयति । कर्मानुष्ठानस्य भगवद्भक्तावप्युपयोगिताऽस्त्येव । यथाहुः—

" तावत्कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता ।
मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते ॥ "
" धर्मः स्वनुष्ठितः पुंसां विष्वक्सेनकथासु यः ।
नोत्पादयेद्यदि रतिं श्रम एव हि केवलम् ॥ " इति ।

तस्या भक्तेः स्वरूपं तु " भक्तिर्भजनं कायेन वाचा मनसा वा निष्पाद्यो भजनीयस्य तुष्टिहेतुर्व्यापारो भजमानपुरुषनिष्ठः " इत्याद्युक्तरीत्या बोध्यम् । सा च भक्तिर्नवविधा भागवतादावुक्ता—

" श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् " इत्यादिना ।

अखण्डानन्दबोधात्मकस्य गुरोः सगुणस्य निर्गुणस्य वा शब्देन ज्ञानं श्रवणभक्तिः तच्च सगुणस्य प्रीतिकरम् । उक्तज्ञानरूपस्य श्रवणस्य कीर्तनहेतुत्वम् । कीर्तनं च तथाविधस्य बोधकशब्दोच्चारणम् । इदमपि प्रीतिकरं भवत्येव । एवमन्येषामपि प्रकाराणां भगवत्प्रीतिकरत्वं बोध्यम् ॥

तत्रात्मनिवेदनं तावत् यथा विक्रीतस्य गवादेर्योगक्षेमचिन्तायामनभिनिवेशस्तथा स्वकीयायां योगक्षेमचिन्तायाम् ।

" अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ "

इति भगवदुक्तं प्रतिसन्धाय सदा विष्णुरेव चिन्त्य इत्यर्थः ।

सत्यज्ञानानन्दात्मके गुरुस्वरूपे स्वाभेदज्ञानमप्यात्मनिवेदनरूपमेव । परााया भक्तेश्च ज्ञानसाधनत्वं,

" यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥ " इति श्रुतेः ।

विषयस्त्वयं निबन्धग्रन्थेषु सुस्पष्टमुपपादित एव ।

एतस्याः भक्तेः साङ्गं निरूपणं पञ्चभिरध्यायैः सटीकैस्तथा प्रतिपादितमस्ति, यथैकत्र तथाविधं निरूपणं प्रायो दुर्लभमेव स्यात् ।

एवंरीत्या ज्ञानकर्मभक्तियोगानां सम्यङ्निरूपणानन्तरं योगरहस्ये योगक्रियायाः सम्यग्वर्णनं कृतमस्ति । योगशास्त्रस्य विपये एतावदेव वक्तुं शक्यं, यत्—दृष्टकार्यकारणभावमात्रमालम्ब्यानुष्ठानमात्रसापेक्षमेतदिति सर्वथा महतः श्रेयसो जनकं भवितुमर्हति ।

श्री. प. प. स्वामिचरणाः स्वयं योगानुष्ठानेन धर्मज्ञानवैराग्यैश्वर्यसम्पन्नाः स्वकीयानुभवसिद्धमुपायजातमत्र प्रादर्शयन्निति, एतदनुसारेणानुष्ठातृणामैहिकशारीरक्लेशादिनिवृत्तिस्तु जायमाना प्रत्यक्षेणैवानुभवितुं शक्या

तेनैव च न्यायेन ब्रह्मसाक्षात्कारादावपि तदनुष्ठानमवश्यमुपयोगि भविष्यत्येवेति ।

गुरुचरित्रटीकायामस्यां वेदान्त-धर्मशास्त्र-भक्तिशास्त्र-योगशास्त्रादिसिद्धान्ताः प्रायः सर्व एव प्रकाशिताः । दिङ्मात्रमस्माभिरत्रोपस्थापितमिति सत्यमेवायं ग्रन्थः साक्षाद्भगवतोक्ता गीतेव, अघटितघटनापटीयस्त्वं येषां चरितदर्शनतो बहुत्रावगतं, तथाभूतैः, अत एव भगवद्दत्तावतारभूतैर्लोकानुग्रहमात्रमुद्दिश्य विरचितः महते उपकाराय भवतीत्यत्र न कोऽपि सन्देहः । न केवलं ग्रन्थोऽयं मुमुक्षूणामुपकारकोऽपि तु वास्तविकीं त्रिवर्गसिद्ध्यात्मिकां समाजस्योन्नतिमभिलपतामपि महते उपकाराय समर्थः ।

श्री. प. प. गुरुवरस्वामिचरणविनिर्मितग्रन्थप्रकाशनसमित्या क्रियमाणोऽयं प्रयत्नः सर्वथा स्तुत्य एव ।

एतावद्भिः शब्दैरेव गुरुचरणारविन्दं स्मरन् विरमामि ।

मितिः—फाल्गुन शुक्ल १३, बुधे<br>
सं. २०१०,

इति—<br>
हरिरामशास्त्री शुक्लः

---

श्रीदत्त

# द्विसाहस्रीमाहात्म्यम्

सुविदितमेव विदुषां यत्परमगुरवः श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्याः श्रीमद्वासुदेवानंदस्वामिचरणाः दर्शनस्पर्शनभाषणादिभिः प्रत्यक्षीकृत-स्वाभिन्नेशाः श्रीमद्दत्तात्रेयावतारा एव । यतः—

यदुक्तं द्विसाहस्रीसंहितायां श्रीमन्नृसिंहसरस्वतीनामघटितघटनापटीय-स्त्वेन साक्षाद्भगवत्त्वं प्रतिपादयद्भिः श्रीमद्भिः ।

ओंकारोच्चारणं जातमात्रेण नयनं तथा
स्वर्णतामयसोऽभ्यासमृतेऽपि ब्रम्हपाटनम्
तत्त्वोपदेशनं पित्रोर्बाल्ये तीर्थाटनं तथा
योगाख्यापनसंन्यासवर्त्मसंस्थापनं तथा
कथं भाव्यं द्राग्घरणं प्रतीपाच्चरणै रुजः
तथावाचोपि विद्वत्तादानं स्त्राग्विप्रदुर्गतेः
हरणं त्रिस्थलीयात्राच्चरणमित्यादिभिः श्लोकैः—

प्रायः सर्वमेतद्दरीदृश्यत एव स्वामिचरणारविन्देषु तत्सच्चरित्रवेत्तृभिः अपि च—

प्रत्यक्षस्तु सतां तत्र कच्चराणां त्वगोचरः
सोप्यन्यत्रावतीर्यात्र स्वरूपेणेष्टकामदः

इति श्रीपादश्रीवल्लभचरितमनुकुर्वन् योऽद्यापि मस्करिस्वरूपेणाभीष्ट-फलदानादिभिर्दिव्यमंत्रप्रदानादिभिश्च स्वाननुगृण्हातीति विस्पष्टमेव श्री-गुरुराजः सविशेषनिर्विशेषोभयरूपं परं ब्रम्हैवेति। ब्राह्मणत्रयीव बहवः प्रादुर-भवन् प्रबन्धाः प्राकृतभाषायां गीर्वाणभाषायां च स्वामिवदनारविन्देभ्यः ॥ तेषु प्रणवतुल्यमंत्रमयः सकलाभीष्टार्थप्रदः द्विसाहस्रीसंहिताख्यो ग्रन्थः विराजतेतराम् । अस्य च ग्रन्थस्य श्रीमद्दत्तावतारत्वेन सर्वोत्कृष्टत्वं स्वामि-भिरेव प्रतिपादितम् ग्रन्थान्ते-यथा—

षडष्टाष्टादशमिते शालिवाहशकेऽमलः
ग्रन्थात्माविरभूत् श्रीमान् दत्तात्रेयोऽवतारकः ॥

इति। मंत्रा एव हि देवता इति न्यायेन श्रीमद्दत्तात्रेयाऽभिन्नमंत्रमयोऽयं ग्रन्थ इति प्रतिभाति। अस्य च श्रीशब्दोपलक्षितसर्वैश्वर्ययुक्तत्वेन स्वभक्ताभीष्ट-संपादनसामर्थ्यं सूचितं भवति। टीकाग्रन्थांते स्पष्टमेवोक्तं गुरुवर्यैः संहितेऽयं द्विसाहस्री त्रिकांडाभीष्टदा सतीति ॥ अभीष्टमत्र सुखमेव।

ननु नितरां सत्यमेवैतत् यत् सर्वेऽपि पुरुषाः सुखमेवेच्छंति—तस्मात्सुख-मेव पुरुषार्थः। पुरुषैरर्थ्यंत इति निर्वचनात्। तच्च सुखं द्विविधम्—नित्यं अनित्यं च। तत्र नित्यसुखं मोक्षः अनित्यसुखं कामः। यथा पुरुषाः सुख-मिच्छंति तथा तत्प्राप्तिकारणमपीच्छंति। तत्र मोक्षप्राप्तिकारणं धर्मः। कामसुखप्राप्तिकारणं चार्थः। अतः धर्मार्थावपि पुरुषार्थौ। एवं धर्मार्थ-काममोक्षाख्याश्चत्वारः पुरुषार्थाः तदनुसारेणात्र पुरुषा अपि त्रिविधाः मुक्ताः मुमुक्षवः विषयिणश्च सर्वेषामप्येतेपामभीष्टार्थप्रदेयं द्विसाहस्री। उक्तं च द्वितीयाध्याये—

मुमुक्षुभेषजं मुक्तजीवनं विषयीष्टदम्। श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वाद्व-च्मि तेऽल्पकम् ॥ १ ॥ उक्तं तट्टीकायां गुरुवर्यैः विषयिणां श्रवणेन पठनेन चाभीष्टार्थप्रदम्। मुमुक्षूणां संसाररोगनिवर्तकं भेषजम्। मुक्तानां निरुपमा-ल्हादजनकत्वेनैव जीवनभूतम् इत्यादि

ननु मुक्ताः मोक्षसुखं प्राप्ताः कृतकृत्या एव। मुमुक्षवः मोक्षसुखार्थमेव प्रवृत्ताः। तेषाममभीष्टार्थलाभे न काऽपि हानिः। विषयिणां तु धनाद्यर्थलाभे ऽनर्थ एव स्यात्, इति न मन्तव्यम्। द्विसाहस्र्युपासनया प्राप्तानां धना-दीनां नानर्थावहत्वम। तेषां प्रसादरूपत्वात् तदुक्तमेकादशाध्याये द्विसाह-स्र्याम्।

अर्थपूर्णं घटं लेभे सद्गुरोः संप्रसादतः इति मंत्रटीकायां गुरुवर्यैः। संप्र-सादोऽयं कथम्। यतो धननिमित्तोऽनर्थः श्रूयते। सत्यम्। शुचीनां भग-वन्निष्ठानां धनलाभे यज्ञादि चित्तशोधकं कर्म भवति नेतरेषामित्यादि। एवं त्रिंशाध्याये अचला कमला दास्यं मदीयं चाप्यसंशयम्, इति मंत्रव्याख्या-

यामपि भगवन्निष्ठानां धनादिलाभो नानर्थकर इति सूचितम् एवं दारागारार्थगोपुत्रादिविषयाकृष्टचेतसां सकामं भजनमपि नानर्थावहम्। तदुक्तम् "तस्मात्तं विधिना साध्वि भज द्राक् सिद्धिदोऽस्ति स' इति मंत्रव्याख्यायां गुरुवर्यैः "यद्यपि सकामं भजनं मोक्षानुचितम्, तथापि कामकलुषितचित्तानामन्तर्मुखतासंपादनार्थं तद्द्वाराऽनायासेन रुच्युत्पादकम्, कामवशादपीश्वरभजनं जातं चेद्वस्तुशक्तिप्रभावात् कामबीजभर्जनपूर्वकमधिकारित्वं प्रसादं च दास्यत्येवेति। वस्तुतस्तु ये सागारदारसुतादिविषयाकृष्टचेतसः तान् सगुणब्रह्मप्रसादरूपफलेनादरपूर्वकं परे तत्वे प्रवर्तयितुमेवास्य ग्रन्थस्य विनिर्मितिरित्युपक्रम एव व्याचख्युर्गुरुवर्याः—यथा इह खल्वहो अपि गंभीरा दुरवगाह्या विचित्रा माया चेयं यदयं सर्वो जंतुः परमार्थतः इत्यारभ्य नूनं परस्यैव मायया मोमुह्यमानः प्रायशः सर्वोऽपि लोको बंभ्रमीति। तद्भ्रमपरिहारार्थं मातापितृशतेभ्योऽपि गरीयसीभिः श्रुतिभिः परमकारुणिकैर्भाष्यकृद्भिर्बहु बोधिता अपि मिष्टाशी रुग्णो बालो निम्बमिव विषयाकृष्टचित्तास्संसारिणस्तं बोधं प्रायो नाद्रियंतेऽतः खंडलड्डुकवत्सगुणब्रह्मप्रसादरूपफलेन तानादरपूर्वकं परे तत्वे प्रवर्तयितुं श्रीदत्तप्रेरणयात्रेयगोत्रो वासुदेवशर्मा कश्चिद्विप्रः श्रुतिसारसंग्रहरूपं गुरुचरितग्रन्थं चिकीर्षुरित्यादि, तथा च परतत्त्वप्रापकोऽयं ग्रन्थः। परतत्त्वप्रापकेषु वेदान्तादिग्रन्थेषु इहामुत्रफलभोगविरक्ताः मुमुक्षव एवाधिकारिणो भवंति। अत्र तु विषयाकृष्टचेतसोऽपि। एतदुक्तं भवति—विषयाकृष्टचेतसः एतदुपासनया भगवत्प्रसादरूपं स्वाभिलषितं फलं प्राप्नुवंति। फललब्ध्या तुष्टान्तःकरणाश्च पुनरुपासनायामेव प्रवर्तंते। एवं भक्तिदार्ढ्येन प्रसादलभ्यज्ञानमपि लभंते। प्रसादलभ्यज्ञानतश्च सायुज्यं लभंते। उक्तमेकोनविंशाध्याये

ईशप्रसादात्सकलार्थयुग्ययौ सायुज्यमंते दृढभक्तियोगतः ॥

यद्यपि सकलाभीष्टार्थप्रदाः बहवो मंत्रास्तंत्रादिषु प्रसिद्धाः दुर्गासप्तशत्यादयो मंत्रमयाः प्राचीना ग्रन्थाश्च तथापि तेषां शापितत्वेन कीलितत्वेन प्रतिबद्धप्रभावत्वम्। शापविमोचनोत्कीलनावरणपूजनबलिदानादिषु स्वल्पेऽपि वैगुण्ये फलाभावप्रसंगश्च अस्य तु न क्वापि शापप्रसरावसर

इत्यप्रतिबद्धप्रभाववत्वेनानायासेन फलशालित्वमुक्तं गुरुवर्यैः अनायासेन काम्यार्थसिद्धिः सद्यो भविष्यतीत्यपरं वैशिष्ट्यम्। आस्तां तावदेतत्। ये तु

पततु नभः स्फुटतु मही पतंतु गिरयोच्चलंतु वारिधयः। अधरोत्तरमस्तु जगत्का हानिर्वीतरागस्येत्यादिसूक्ताः मागारदारादिविषयान् वांतमिव मन्यमाना ,मुमुक्षवस्तेषामपि भवरोगनिवर्तकभेषजमिदम्। ब्रह्मविद्याप्रतिपादकत्वात्। तथाहि

नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः
यत्तत्वं मीलति ज्ञानां तं चिदानन्दसद्गुरुम् ॥ १ ॥
भात्यनेकवदेकं सद्धीभेदादेकरूपया
विदास्यैक्यं परं ब्रह्म तत्सत्यं दत्तसंज्ञितम् ॥ २ ॥

इत्यादिना सकलवेदान्तसारः संगृहीतः चतुर्थाध्याये च श्रीगुरुगीतारूपाध्यात्मविद्यैवोपदिष्टा तत्रैव श्रीदत्तात्रेयार्जुनसंवादेन योगोऽपि प्रदर्शितः॥ तथा च त्रयोदशाध्यायात्मके ज्ञानकांडे ततश्च पंचाध्यायात्मककर्मकाण्डेऽनंतरं पंचाध्यायात्मकभक्तिकांडे च ज्ञानकर्मभक्तीनां परतत्त्वपथां तथा तच्चरित्रोपन्यासपूर्वकं विवरणं कृतं यथा अज्ञा अपि तत्तत्त्वमनायासेन जानीयुरिति। अवधातव्यमेतत्।

भक्त्या पारायणैरेव दत्तात्रेयो जगद्गुरुः
दत्वा च मस्तके हस्तं शक्तिपातं करोति हि ॥

अस्यैकं मुद्रितं पुस्तकं गुरुवर्यैः स्वाक्षरैः संशोधितमस्मत्पितामहेभ्यो दत्तमासीत्। तस्मिन ग्रन्थान्ते—

षडभ्राष्टादशमिते शालिवाहशकेऽमले
गन्यात्माविरभूच्छ्रीमान्दत्तात्रेयोवतारकः

अयं श्लोको लिखितोस्ति श्रीगुरुवर्यैः स्वाक्षरैरेव अपरं च-पंचमाध्याये द्वाविंशतितममंत्रोतरं श्रीपाद उवाच इति मंत्रः संलिखितोऽस्ति।

यदाहं मुद्रितं पुस्तकं समासाद्य मंत्रान् गणयितुं प्रारभम्।

विहितेष्यनेकवारं प्रयत्ने मंत्राणां द्विसहस्रमितां संख्यां संख्यातुं नापारयम्। ततः श्रीगुरुहस्तसंशोधितं पुस्तकमादाय प्रवृत्ते संख्यातुं पंचमाध्याये श्रीपाद उवाच, इति मंत्रं दृष्टवान्। पंचदशाध्याये चार्धश्लोकात्मकौ मंत्रौ।

अचिन्तयंश्च यथा कात्यायनीतंत्रे डामरतंत्रे च दुर्गासप्तशतीमंत्रविभागपराः कारिकाः संति। मार्कंडेय उवाचेति मंत्रः प्राथमिको मतः इत्याद्यास्तथात्राऽपि यदि स्युस्तदोपासकानाम्मंत्रज्ञाने परं साधनं भवेत्—यतः सद्यः फलप्रदेषु संपुटितपारायणादिषु मंत्रज्ञानस्य परमावश्यकत्वात्।

ततश्चेशेरितधीः द्विसाहस्रीमंत्रविभागपराणां कारिकाणां निर्माणे प्रयत्नमकरवम्।

अनधिकारिणापि मया यदेतत्किंचित्कृतमेतच्छ्रेयोभाक्त्वं तु प्रकाशकानां श्रीमतां गुळवणीमहोदयानां तथा श्रीमतां दत्तात्रेयशास्त्रीकवीश्वराणामित्यवितथं ब्रवीमीति।

नर्शी
चैत्र शु. प्रतिपदि
रविवासरे १८७६

मोरेश्वरात्मजः धुंडिराजशर्मा माहूरकर

अथास्य श्रीगुरुभिरेवादिष्टा सप्ताहपाठपद्धतिः—प्रथमा-प्रथमेह्नि चतुर्थाध्यायान्तम्। द्वितीये नवमान्तम्। तृतीये चतुर्दशाध्यायान्तम् चतुर्थे सप्तदशाध्यायान्तम्—पंचमे एकोनविंशाध्यायान्तम्। षष्ठे एकविंशाध्यायान्तम् सप्तमे त्रयोविंशाध्यायान्तं पठित्वा रहस्यद्वयं पठेत्—प्रत्यहमादौ अंन्यपूजनोत्तरं श्रीवैष्णवेत्यादिस्तुतयः पठेत् अन्ते चोत्तरपूजनं कृत्वा—रसज्ञा वशेत्यपराधक्षमापनस्तोत्रं पठेत्।

द्वितीया तु प्रत्यहं श्रीवैष्णवेत्यारभ्य रहस्यान्तं पारायणम्। तत्र उत्तरपूजनोत्तरमपराधक्षमापनस्तोत्रम्।

श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु

## द्विसाहस्रीसंहितामंत्रविभागकारिका:

नेत्रत्रयवसुभूमितशाके यः स्थापनामकरोत् ॥
श्रीदत्तपादुकानां नर्सीग्रामे सुर्यंत्रयुजाम् ॥ १ ॥
श्रीवासुदेवयतिराण्माघापरपक्षके त्रयोदश्याम् ॥
तमहं सद्गुरुराजं वन्दे योऽद्यापि तत्र जागर्ति ॥ २ ॥
सत्कल्पद्रुमतुल्यां यः कृतवान् संहितां द्विसाहस्रीम् ॥
दत्तावतार इति यामवदत्सद्ग्रन्थरूपोऽसौ ॥ ३ ॥
कांडैस्त्रिभिर्युता या यत्राध्यायास्त्रयः सविंशतिकाः ॥
मंत्राणां कामदुहां यत्र सहस्रद्वयं वरीवर्ति ॥ ४ ॥
तेषां प्रविभागोऽयं श्रीसद्गुरुवक्त्रपद्मजातानाम् ॥
विदधामि चित्तशुद्ध्यै तेनासौ प्रीयतां देशिकार्यः ॥ ५ ॥
केचन उवाच मंत्रा ह्यर्धश्लोकात्मका ह्यपरे ॥
सार्धश्लोकाः केचन श्लोकात्मानस्तथा चान्ये ॥ ६ ॥

१

अथ वक्ष्ये शुभान् मंत्रान् प्रथमाध्यायगोचरान् ॥
नौम्युदेतीति चारभ्य मंत्रा विंशतिरादिमाः ॥ १ ॥
तत्राज्ञानसमुत्पन्नद्वन्द्वाभावः प्रवर्तते ॥
इत्यर्धश्लोकमंत्रोऽयं पूर्णश्लोकात्मकास्ततः ॥ २ ॥
एकविंशतिसंख्याका वासुदेवमुनीरिताः ॥
इत्थं हि प्रथमाध्याये मंत्रा द्व्यब्धिमिताः स्मृताः (४२) ॥ ३ ॥

॥ इति प्रथमाध्याये मंत्रविभागः ॥

२

द्वितीये हि तथाध्याये ह्यादौ षट् श्लोकमंत्रकाः ॥
सप्तमः खलु सिद्धोक्तिस्ततः श्लोकात्मकोष्टमः ॥ १ ॥
नवमो हि मनुर्नामधारकोक्तिः प्रकीर्तितः ॥
दशमश्लोकमंत्रश्च सिद्धोक्त्यैकादश स्मृताः ॥ २ ॥

ततो द्वौ श्लोकमंत्रौ च ह्यथोक्तिर्नामधारिणः ॥
स्त्रष्टेपि लौकिके मंत्रः सिद्धोक्तिश्च ततः परम् ॥ ३ ॥
ब्रह्मोक्तिश्च ततो मंत्राः पूर्णश्लोकात्मकाश्च षट् ॥
गुरूक्तिश्च ततो ज्ञेया विंशतिश्लोकमंत्रकाः ॥ ४ ॥
ततश्च दीपकोक्त्याख्यो द्विषष्टितमसन्मनुः ॥
श्रीसद्गुरुर्देवदेव इत्यादिश्लोकमंत्रकौ ॥ ५ ॥
ततो विष्णुरुवाचेति दशमंत्रास्ततः स्मृताः ॥
पूर्णश्लोकात्मका वक्तृश्रोतॄणामिष्टदायकाः ॥ ६ ॥
द्वितीयेऽस्मिन्तथाध्याये मंत्राणां पंचसप्ततिः ॥
श्लोकमंत्राः ६३ उवाचमंत्राः १२ आहत्य ७५

३

तार्तीये च तथाध्याये ह्यादिमो मनुरीरितः ॥
नामधारकवाग्रूपः ततः श्लोकात्मकोऽपरः ॥ १ ॥
ततः सिद्ध उवाचेति तृतीयो मनुसत्तमः ॥
मनवश्च चतुश्चत्वारिंशत्श्लोकात्मकास्ततः ॥ २ ॥
तदग्रे हि मनुर्नामधारकोक्तिः प्रकीर्तितः
ततः श्लोकात्मको मंत्रः सिद्धोक्तिश्च ततः परम् ॥ ३ ॥
ततश्च द्वादशश्लोकास्तावन्तो मनवः स्मृताः
द्विषष्टिश्च तथा मंत्रास्तार्तीयेस्मिन्निरूपिताः (६२) ॥ ४ ॥

४

श्यायुःकीर्त्यृद्धिहेतुर्नेत्यादिमा मनवः स्मृताः
पंचाशच्च तथा सप्त चतुर्थे मुनिभाविताः (५७) ॥ १ ॥

५

अथ मंत्रान् प्रवक्ष्यामि पंचमाध्यायगोचरान् ॥
आदिमो हि मनुर्नामधारकोक्तिः प्रकीर्तितः ॥ १ ॥
पुराणेति द्वितीयश्च सिद्धोक्तिश्च ततः परम् ॥
ततश्चाष्टौ श्लोकमंत्रा द्वादशो ब्राह्मणीवचः ॥ २ ॥

चत्वारश्च ततः श्लोकास्तावन्तो मनवस्तथा ।
ब्राम्हण्युवाचेति ततः स्मृतस्सप्तदशो मनुः ॥ ३ ॥
ततश्चैकः श्लोकमनुर्विप्रोक्तिश्च ततः परम्
ततश्चाष्टौ श्लोकमंत्राः श्रीपादोक्तिस्ततः परम् ॥ ४ ॥
ततो नव श्लोकमंत्रा ह्यष्टत्रिंशत्तमो मनुः ।
श्रीपादोक्तिस्ततः पंच श्लोकमंत्राः प्रकीर्तिताः ॥ ५ ॥
त्रयश्च चत्वारिंशच्च मंत्राः प्रोक्ता हि पंचमे (४३) ॥ ६ ॥

६

नामधारक उवाचेति षष्ठाध्यायादिमो मनुः
शैवेत्यादिर्द्वितीयश्च सिद्धोक्तिश्च तृतीयकः ॥ १ ॥
ततः षट् श्लोकमंत्राः स्यू रावणोक्तिस्ततो मनुः ।
द्वौ च श्लोकमनू प्रोक्तौ ततः शिव उवाच हि ॥ २ ॥
त्रयोदशतमो मंत्रः पंच श्लोकास्ततः परम् ॥
मंत्ररूपा शिवोक्तिश्चैकोनविंशो मनुर्मतः ॥ ३ ॥
चत्वारिंशत्श्लोकरूपा मनवश्च ततः स्मृताः
एकोनषष्टिसंख्याकाः मनवोऽस्मिन्निरूपिताः (५९) ॥ ४ ॥

७

सप्तमेऽस्मिन्तथाध्याये प्रथमो मनुरीरितः
नामधारकवागाख्यः श्लोकमंत्रस्ततः परम् ॥ १ ॥
ततः सिद्ध उवाचेति तृतीयः संप्रकीर्तितः ।
ततो नव श्लोकमंत्रा ब्राम्हण्युक्तिस्त्रयोदशः ॥ २ ॥
ततश्चैकः श्लोकमंत्रः श्रीपादोक्तिस्ततः परम् ।
ततश्चैकः श्लोकमंत्रो ब्राम्हण्युक्तिस्ततः परम् ॥ ३ ॥
त्वयोक्तमित्ययं मंत्रो ह्यष्टादशतमस्ततः ।
श्रीपादोक्तिस्ततः सप्त श्लोकमंत्राः प्रकीर्तिताः ॥ ४ ॥
शिव उवाचेति ततस्सप्तविंशः स्मृतो मनुः ।
भक्त्येति षट् श्लोकमंत्रा ब्राम्हण्युक्तिस्ततः परम् ॥ ५ ॥
ततश्च मनवस्सप्त श्लोकरूपाः प्रकीर्तिताः ।

नामधारक उवाच द्विचत्वारिंशत्तमो मनुः ॥ ६ ॥
ततः षट् श्लोकमंत्राश्च सिद्धोक्तिश्च ततः परम् ।
ततः षोडशसंख्याकाः श्लोकमंत्राः प्रकीर्तिताः ॥ ७ ॥
इत्थं हि सप्तमेऽध्याये मनूनां षष्ठिरुत्तमा । (६०)

८

सप्तसप्ततिकश्लोकेऽष्टमेऽध्याये महोदये ।
आदिमो हि मनुर्नामधारकोक्तिः प्रकीर्तितः ॥ १ ॥
द्वितीयः श्लोकमंत्रश्च सिद्धोक्तिश्च तृतीयकः ।
ऊनत्रिंशत्ततः श्लोका मनुरूपाश्च ते स्मृताः ॥ २ ॥
सत्श्रीगुरुरुवाचेति ह्यष्टत्रिंशत् ततः परम् ।
श्लोकमंत्रास्ततो नामधारकोक्तिर्मनूत्तमः ॥ ३ ॥
द्विसप्ततितमः प्रोक्तो यत्प्रभावेति वै मनुः ।
ततः सिद्ध उवाचेति ह्यष्ट मंत्रास्ततः परम् ॥ ४ ॥
श्लोकरूपास्तथा ह्यस्मिन्नशीतिर्मनवः स्मृताः ॥ (८०)

९

श्रीदत्त

अध्याये नवमे श्लोकास्त्र्यशीतिर्गुरुनिर्मिते ।
नामधारक उवाचाद्यश्लोकमंत्रस्तथापरः ॥ १ ॥
सिद्धोक्तिश्च तृतीयः स्यादष्टौ श्लोकास्ततः परम् ॥
मनुरूपा द्वादशोऽथ श्रीगुरूक्तिर्मनूत्तमः ॥ २ ॥
ततो द्वौ श्लोकमंत्रौ स्तो भगिन्युक्तिस्ततः परम् ।
गतिमंत्रस्ततः प्रोक्तः श्रीगुरूक्तिस्ततः परम् ॥ ३ ॥
ततः सप्त श्लोकमंत्रा विप्रोक्तिः पंचविंशकः ।
पंच श्लोकास्ततः प्रोक्ताः श्रीगुरूक्तिस्ततः परम् ॥ ४ ॥
ततस्त्रयः श्लोकमंत्राः सायंदेव उवाच हि ।
पंचत्रिंशत्तमो मंत्रः श्लोकमंत्रस्ततः परम् ॥ ५ ॥
श्रीगुरुक्तिस्ततः प्रोक्तः श्लोकमंत्रस्ततः परम् ॥
सायन्देवोक्तिरेकोनचत्वारिंशत्तमो मनुः ॥ ६ ॥

ततश्चतुर्दश श्लोका मनुरूपा महाफलाः ॥
श्रीगुरूक्तिस्ततो मंत्रश्लोकाः पंचदश स्मृताः ॥ ७ ॥
मनुरूपास्ततो नामधारकोक्तिर्मनुर्मतः ॥
ततश्चैकः श्लोकमंत्रः सिद्धोक्तिश्च ततः परम् ॥ ८ ॥
ततः श्लोकाः स्मृताः पंचविंशतिर्मनवश्च ते ।
एवं हि नवमाध्याये मंत्राः षण्णवतिः स्मृताः (९६) ॥ ९ ॥

१०

दशमे पंचचत्वारिंशच्छ्लोके ह्यादिमो मनुः ।
नामधारकवाग्रूपः शिष्येति श्लोकयुङ्मनुः ॥ १ ॥
ततः सिद्ध उवाचेति तृतीयो मनुरीरितः ।
ततस्त्रयः श्लोकमंत्राः श्रीगुरूक्तिस्ततः परम् ॥ २ ॥
अथ द्वौ श्लोकमंत्रौ च श्रीगुरूक्तिस्ततः परम् ।
हन्तेति श्लोकमंत्रौ द्वौ द्विजोक्तिश्च ततो मनुः ॥ ३ ॥
ततश्चैकः श्लोकमंत्रः श्रीगुरूक्तिस्ततः परम् ।
ऊनत्रिंशत्ततः श्लोका मनुरूपाः प्रकीर्तिताः ॥ ४ ॥
विप्र उवाचेति पंचचत्वारिंशत्तमो मनुः ।
ततः सप्त श्लोकमंत्रा द्विपंचाशन्मितास्तथा ॥ ५ ॥
मनवोऽस्मिंस्तथा ख्याता वासुदेवेन भाषिताः ।
साक्षाद्दत्तावतारेण गणेशब्रम्हसूनुना (५२) ॥ ६ ॥

११

एकादशे पंचपंचाशच्छ्लोके ह्यादिमो मनुः ।
नामधारक उवाचेति ततः श्लोकात्मको मनुः ॥ १ ॥
ततः सिद्ध उवाचेति तार्तीयः परिकीर्तितः ।
पंचविंशतिसंख्याकाः श्लोकमंत्रास्ततः परम् ॥ २ ॥
नामधारक उवाचाथ ह्यूनत्रिंशत्तमः स्मृतः ।
ततश्चैकः श्लोकमंत्रः सिद्धोक्तिश्च ततः परम् ॥ ३ ॥
ततो दश श्लोकमंत्रा गंगानुज उवाच हि ।
त्रिचत्वारिंशत्तमोथ पंच श्लोकात्मकास्ततः ॥ ४ ॥

मनवः श्रीगुरूक्तिश्च ततः श्लोकास्त्रयोदश ।
मनुरूपास्तथा ह्येकषष्टिर्हि मनवोत्र तु (६१) ॥ ५ ॥

१२

सप्तषष्टिर्मताः श्लोका द्वादशे प्रथमो मनुः ।
नामधारकवागाख्यस्ततः श्लोकात्मको मनुः ॥ १ ॥
ततः सिद्ध उवाचेति तृतीयः परिकीर्तितः ।
गतिरित्यादयो मंत्रा द्वादशाथ स्मृतास्ततः ॥ २ ॥
विप्र उवाचेति ततः षोडशो मनुरीरितः ।
ततस्त्रयः श्लोकमंत्रा ब्राम्हण्युक्तिस्ततः परम् ॥ ३ ॥
चत्वारः श्लोकमंत्राश्च पिशाचोक्तिस्ततः परम् ।
ततश्चैकः श्लोकमंत्रः श्रीगुरूक्तिस्ततः स्मृता ॥ ४ ॥
चत्वारश्च ततः श्लोकाः पिशाचोक्तिस्ततः परम् ॥
ततो नव श्लोकमंत्रा ब्राह्मण्युक्तिस्ततः स्मृता ॥ ५ ॥
अष्टौ श्लोकास्ततः प्रोक्ताः सोवाचेति मनुस्ततः
स्मृतो वै ह्येकपंचाशत्तमो द्वादश वै ततः ॥ ६ ॥
श्लोकमंत्रास्ततः सोवाचेति मंत्रः प्रकीर्तितः ॥
श्लोकमंत्रस्ततः साधुरुवाचेति मनुस्ततः ॥ ७ ॥
द्वादश श्लोकमंत्राश्च भोगमोक्षप्रदायकाः ।
तथा चास्मिन्समाध्याये मंत्राणामष्टसप्ततिः (७८) ॥ ८ ॥

१३

ततस्त्रयोदशे ह्यूनपंचाशच्छ्लोकसंयुते
नामधारकवाङ्मंत्रो ह्यासाद्येति ततो मनुः ॥ १ ॥
ततः सिद्ध उवाचेति मनवो द्वादश स्मृताः ।
श्लोकरूपाः श्रीगुरूक्तिः षोडशो मनुरीरितः ॥ २ ॥
दंडीमनुस्ततः प्रोक्तो राजोवाचेति वै ततः ।
ततश्चतुर्विंशतिश्च श्लोकमंत्राः प्रकीर्तिताः ॥ ३ ॥
त्रिविक्रम उवाच त्रिचत्वारिंशत्तमो मनुः ।

